**मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब**
**<u>संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या...</u>**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन आदेश क्रमांकः एमसीओ २०१५/प्र.क्र. २८०/नवि १४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २७ ऑगस्ट, २०१५

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्य पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम २००५ मधील कलम ४(४) व ४(५) मधील तरतुदीनुसार खाली नमुद केलल्या नगरपरिषद मुख्याधिकारी गट-अ आणि गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय कारणास्तव बदल्या करण्यात येत असुन त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे :-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व पदनाम | पदस्थापनेचे पद | शेरा |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. रविंद्र पांढरे, मुख्याधिकारी यवतमाळ नगरपरिषद, जि. यवतमाळ | जिल्हा प्रशासन अधिकारी, यवतमाळ | प्रशासकीय कारणास्तव बदली अधिनियम २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व ४(५) मधील तरतुदीनुसार |
| २ | श्री. सुदाम धुपे, जिल्हा प्रशासन अधिकारी, यवतमाळ | मुख्याधिकारी यवतमाळ नगरपरिषद, जि. यवतमाळ | प्रशासकीय कारणास्तव बदली अधिनियम २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व ४(५) मधील तरतुदीनुसार |
| ३ | श्री. दादाराव डोल्हारकर, मुख्याधिकारी कारंजा नगरपरिषद, जि. वाशिम | मुख्याधिकारी वणी नगरपरिषद, जि. यवतमाळ | प्रशासकीय कारणास्तव बदली अधिनियम २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व ४(५) मधील तरतुदीनुसार |
| ४ | श्री. प्रमोद वानखेडे, मुख्याधिकारी ब्रम्हपूरी नगरपरिषद, जि. चंद्रपूर | मुख्याधिकारी कारंजा नगरपरिषद, जि. वाशिम | प्रशासकीय कारणास्तव बदली अधिनियम २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व ४(५) मधील तरतुदीनुसार |

०२. सर्व संबंधित जिल्हाधिकारी/नियंत्रक अधिकाऱ्यांनी पर्यायी अधिकारी रुजू होण्याची प्रतिक्षा न करता त्यांच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली असलेल्या व बदली झालेल्या अधिकाऱ्यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. तसेच, संबंधित मुख्याधिकाऱ्यांना कार्यमुक्त केल्याबाबतचा अहवाल

दि. २८.०८.२०१५ पर्यंत शासनास ई-मेल द्वारे urbandevp14@gmail.com या ई-मेल पत्त्यावर न चुकता सादर करावा. तसेच सर्व संबंधित जिल्हाधिकाऱ्यांनी त्यांच्या जिल्ह्यातील मुख्याधिकाऱ्यांच्या बदलीमुळे रिक्त रहाणाऱ्या नगरपरिषदांच्या मुख्याधिकारी पदाचा अतिरीक्त कार्यभार जवळपासच्या नगरपरिषद मुख्याधिकाऱ्याकडे किंवा महसुल अधिकाऱ्यांकडे सुपुर्द करुन संबंधित मुख्याधिकाऱ्यास कार्यमुक्त करावे.

०३ तसेच या आदेशान्वये करण्यात आलेल्या बदल्या रद्द करणे किंवा त्यात बदल करणे या साठी राजकीय दडपण/ दबाव आणल्याचे निदर्शनास आल्यास संबंधित मुख्याधिकाऱ्यांविरुद्ध महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम १९७९ अनुसार शिस्तभंगाची कारवाई सुरू करण्यात येईल.

०४. सर्व संबंधित मुख्याधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या नविन ठिकाणी तात्काळ रुजू होऊन तसा अनुपालन अहवाल शासन सादर करावा.

०५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८२७१२०४२६५९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Jayasingrao N Patil

Digitally signed by Jayasingrao N Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Jayasingrao N Patil
Date: 2015.08.27 13:58:49 +05'30'

( ज. ना. पाटील )

शासनाचे उपसचिव

**प्रति,**

१. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, वरळी, मुंबई
२. विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक, अमरावती/ नागपूर विभाग.
३. जिल्हाधिकारी यवतमाळ/ वाशिम/ चंद्रपूर
४. नगराध्यक्ष, यवतमाळ नगरपरिषद, जि. यवतमाळ
५. नगराध्यक्ष, कारंजा नगरपरिषद, जि. वाशिम
६. नगराध्यक्ष, ब्रम्हपूरी नगरपरिषद, जि. चंद्रपूर
७. श्री. रविंद्र पांढरे, मुख्याधिकारी यवतमाळ नगरपरिषद, जि. यवतमाळ.
८. श्री. सुदाम धुपे, जिल्हा प्रशासन अधिकारी, यवतमाळ.
९. श्री. दादाराव डोल्हारकर, मुख्याधिकारी कारंजा नगरपरिषद, जि. वाशिम

१०.श्री. प्रमोद वानखेडे, मुख्याधिकारी ब्रम्हपूरी नगरपरिषद, जि. चंद्रपूर.

**प्रतिलिपि,**

१. मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई

२. मा. राज्यमंत्री (नवि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई

३. प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई

४. सहसचिव (कार्यासन नवि १८) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

५. कार्यासन अधिकारी, नवि १८ नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

६. निवड नस्ती/नवि १४